**शबरी आदिवासी घरकुल योजनेची शहरी भागात अंमलबजावणी करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
शासन निर्णय क्रमांक : आविवि-०२२३/प्र.क्र.३०/का.८
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : १९ ऑगस्ट, २०२४

**संदर्भ** :- १) आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय क्र.आविवि-०२२३/प्र.क्र.३०/का.८, दि.११.०१.२०२४.
२) गृहनिर्माण विभाग, शासन परिपत्रक क्र.प्रआयो-२०१८/प्र.क्र.११६/गृनिधो-२, दि.२०.१०.२०१८.

**प्रस्तावना :-**

उपरोक्त संदर्भिय दिनांक ११/०१/२०२४ च्या शासन निर्णयानुसार शबरी आदिवासी घरकुल योजनेची शहरी भागात अंमलबजावणी करण्यासंदर्भात मार्गदर्शक सूचना निर्गमित करण्यात आल्या आहेत. राज्यातील प्रधानमंत्री आवास योजना (नागरी) अंतर्गत गावठाण क्षेत्रातील लाभार्थ्यांच्या पात्रतेबाबत गृहनिर्माण विभागाने संदर्भीय क्र.२ दिनांक २०/१०/२०१८ रोजीच्या शासन निर्णयान्वये अशा सुचना दिलेल्या आहेत की, प्रधानमंत्री आवास योजनेचा (BLC घटकांतर्गत) लाभ घेण्यासाठी अर्जदाराच्या स्वत:च्या नावावर जमीन असणे अनिवार्य आहे, अन्यथा अर्जदार प्रधानमंत्री आवास योजनेचा लाभ घेण्यास पात्र ठरत नाही. सबब, प्रधानमंत्री आवास योजनेच्या यशस्वी अंमलबजावणीसाठी गावठाण क्षेत्रातील ज्या लाभार्थ्यांकडे जमिनीची मालकी नाही, अशा लाभार्थ्यांना मागील ३ वर्षाच्या मालमत्ता कर पावतीच्या आधारे BLC घटकांतर्गत पात्र ठरविण्यात यावे. त्या धर्तीवर शबरी आदिवासी घरकुल योजना शहरी (नागरी भागाकरीता) अंतर्गत गावठाण क्षेत्रातील लाभार्थ्यांच्या पात्रतेसंबंधी सूचना निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

संदर्भाधीन क्र.१ येथील दिनांक ११/०१/२०२४ च्या शासन निर्णयान्वये शबरी आदिवासी घरकुल योजना शहरी भागात राबविण्यासंदर्भात निर्गमित केलेल्या मार्गदर्शक सुचनांमध्ये लाभार्थ्यांच्या पात्रतेसंदर्भात निकष विहीत करण्यात आलेले आहे. गृहनिर्माण विभागाच्या संदर्भाधीन क्र.२ येथील दिनांक २०/१०/२०१८ रोजीच्या शासन निर्णयाच्या धर्तीवर शबरी आदिवासी घरकुल योजनेची शहरी (नागरी) भागात अंमलबजावणी करताना गावठाण क्षेत्रातील ज्या लाभार्थ्यांकडे जमिनीची मालकी नाही अशा लाभार्थ्यांना मागील ३ वर्षाच्या मालमत्ता कर पावतीच्या आधारे पात्र ठरविण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून, त्याचा संकेतांक क्रमांक २०२४०८१९१२०२२७२५२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

GOVIND BALAJI SABNE

Digitally signed by GOVIND BALAJI SABNE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TRIBAL DEVELOPMENT DEPARTMENT,
2.5.4.20=9fae8c57bc74385871d5bfb6d5bf3a8b1325732de12f4e1eb564dcd6e6dcf31f,
postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=F35CCBA6FB37254B3D3E122E1842F419E20858CE28B6DF89F96E5B5693D0BA7E, cn=GOVIND BALAJI SABNE
Date: 2024.08.19 14:10:03 +05'30'

**( गोविंद साबने )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई.
२) मा. सभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
३) मा. अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
४) मा. विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानपरिषद / विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
५) मा. उपसभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
६) मा. उपाध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
७) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
८) मा. उप मुख्यमंत्री (गृह, विधी व न्याय, जलसंपदा व लाभक्षेत्र विकास, गृहनिर्माण, ऊर्जा, राजशिष्टाचार) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
९) मा. उप मुख्यमंत्री (वित्त व नियोजन) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
१०) मा. मंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
११) मा. सर्व मंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
१२) मा. विधानसभा / विधानपरिषद सदस्य (सर्व)
१३) मा. मुख्य सचिव यांचे उप सचिव, मंत्रालय, मुंबई.
१४) अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, सर्व विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५) सर्व विभागीय आयुक्त.
१६) सर्व आयुक्त, महानगरपालिका.
१७) आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
१८) सर्व संबंधित जिल्हाधिकारी.
१९) अपर आयुक्त, आदिवासी विकास, ठाणे /नाशिक/अमरावती/नागपूर.
२०) सर्व संबंधित मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद.
२१) संचालक, राज्य व्यवस्थापन कक्ष-ग्रामीण गृहनिर्माण, बेलापूर, नवी मुंबई.
२२) सर्व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प.
२३) सर्व प्रकल्प संचालक, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा.
२४) अवर सचिव (का-६), (अर्थसंकल्प) आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
२५) सर्व मुख्याधिकारी, नगरपालिका / नगरपंचायत.
२६) निवड नस्ती / (का-०८), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.